विविध राज्य संरक्षित स्मारकांच्या जतन व दुरुस्ती कामांना वित्तीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र.१८४(भाग-२)/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२५

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२४/ प्र.क्र.५८/सां.का.३, दि.१६.०३.२०२४.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारके-२०२१/ प्र.क्र.२०३/सां.का.३, दि.०९.०६.२०२३.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२३/ प्र.क्र.२०४/सां.का.३, दि.१५.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

विविध राज्य संरक्षित स्मारकांच्या जतन व दुरुस्ती कामांना उपर्निर्दिष्ट क्र.१ ते ३ येथील शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता/सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार वेळोवेळी सदर कामांना निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर स्मारकांची कामे प्रगतिपथावर असून आता या स्मारकांच्या जतन व दुरुस्ती कामांच्या देयकांना वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विविध राज्य संरक्षित स्मारकांच्या खालील नमूद कामांसाठी येणाऱ्या एकूण रु.६,८७,७७,७८७/- (अक्षरी रुपये सहा कोटी सत्त्याऐंशी लक्ष सत्याहत्तर हजार सातशे सत्याऐंशी मात्र) इतक्या रकमेच्या देयकांना या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | राज्य संरक्षित स्मारकाचे नाव | रक्कम |
|---|---|---|
| १ | गेट वे ऑफ इंडिया, मुंबई | ₹ ८९,०६,१०९ |
| २ | भरतगड किल्ला, मौजे मसुरे, जि.सिंधुदुर्ग | ₹ ३,०९,२६,१३३ |
| ३ | कोयरीकड किल्ला (कोराईगड), मौ.आंबवणे, ता.मुळशी, जि.पुणे | ₹ २,८९,४५,५४५ |
| | **एकूण** | **₹ ६,८७,७७,७८७** |

२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयास नियोजन विभाग अनौ.सं.क्र.१७४/का-१४४३, दि. २० मार्च, २०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

४. यासाठी होणारा खर्च पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मागणी क्र. झेडडी-२ २२०५, कला व संस्कृति, (००) (१०३) पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) (२२०५ १३०२) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३३११९२२३३६३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.03.31 19:23:24 +05'30'

**( परसराम न. बहुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, (रत्नागिरी, पुणे, छत्रपती संभाजीनगर, नांदेड, नागपूर)
६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, (रत्नागिरी, पुणे, छत्रपती संभाजीनगर, नांदेड, नागपूर)
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, सां.का.३.